**अपर आयुक्त (आस्थापना) यांना विभागीय आयुक्त कार्यालयातील विकास शाखेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः RDD-१३०११/१७५/२०२५/आस्था-३**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट
मुंबई-४००००१
दिनांक : २० जून, २०२५

**संदर्भ** १. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र.मविसे-१०९२/प्र.क्र.३०१९/१०, दि. १५.१०.१९९९.

२. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र.अराप-२००१/प्र.क्र.२१०/१५, दि. ०५.०५.२००१.

३.ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. RDD-१३०११/७८/२०२५/आस्था-३,दि.१३.०५.२०२५

**शासन निर्णय**

ग्राम विकास विभाग, शासन निर्णय दिनांक १६.१०.१९९९ अन्वये विभागीय आयुक्त कार्यालयातील विकास शाखेचे बळकटीकरण करण्यासाठी उप आयुक्त (आस्थापना व अन्य वर्ग १) ची पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयान्वये त्यांना कार्यालयातील विकास शाखेसाठी आहरण व संवितरण अधिकारी असे नमूद केले आहे. तदानुषंगाने ग्राम विकास विभाग, शासन निर्णय दिनांक ०५.०५.२००१ अन्वये विभागीय आयुक्त कार्यालयातील विकास शाखेसाठी त्या शाखेतील उपायुक्त (आस्थापना) यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले आहे. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय दिनांक १३.०५.२०२५ अन्वये विभागीय आयुक्त कार्यालयातील उप आयुक्त (आस्थापना) यांचे पदनामामध्ये अपर आयुक्त (आस्थापना) असा बदल करण्यात आला असल्यामुळे दि. ०५.०५.२००१ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन अपर आयुक्त (आस्थापना) यांना विभागीय आयुक्त कार्यालयातील विकास शाखेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करणे आवश्यक आहे.

२. त्यानुषंगाने संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक ०५.०५.२००१ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७) संवर्गातील विभागीय आयुक्त कार्यालयातील अपर आयुक्त (आस्थापना) यांना विभागीय आयुक्त कार्यालयातील विकास शाखेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

३. अपर आयुक्त (आस्थापना) यांनी आवश्यक ते अधिकार पत्र महालेखापाल कार्यालयाकडून प्राप्त करुन घ्यावे

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०६२०१११००७३९२०** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2025.06.20 11:43:10 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत.

१. मा. मंत्री (ग्राम विकास व पंचायतराज) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास व पंचायतराज) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, मुंबई
४. विभागीय आयुक्त, (सर्व).
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
६. प्रधान महालेखाकार (लेखा आणि हक्क) - । व ॥, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
७. अपर आयुक्त (आस्थापना) विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
९. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.वि/ग्रा.प.), जिल्हा परिषद (सर्व)
१०. निवडनस्ती (का.आस्था-३), बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई